ग्रामीण रूग्णालय राळेगाव जि. यवतमाळ येथील क्ष-किरण यंत्र निर्लेखित करण्यास मान्यता

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय, क्रमांकः संकीर्ण-२०१५/प्र.क्र. २३८/आरोग्य ३

१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : १९ सप्टेंबर, २०१५.

**वाचा :**

१) आरोग्य सेवा संचालनालय यांचे पत्र क्रमांक : संआसे/कक्ष-३/टे-३/राज्यस्तर/ग्रारु,राळेगाव/क्ष-किरण/निर्लेखन/४५६६-७०/१५, दिनांक २१.०४.२०१५.

**प्रस्तावना :**

ग्रामीण रूग्णालय, राळेगांव जि. यवतमाळ येथील कालबाह्य झालेले व दुरूस्त करण्यापलिकडील असलेले क्ष-किरणयंत्र निर्लेखित करण्यास परवानगी देण्याबाबतचा प्रस्ताव सहसंचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांच्याकडून दि. २१ एप्रिल, २०१५ च्या पत्रान्वये शासनास प्राप्त झाला आहे. सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

२. ग्रामीण रूग्णालय, राळेगांव जि. यवतमाळ येथील पुढील तक्त्यात नमूद करण्यात आलेले क्ष-किरण यंत्र जीव वैदयकीय अभियंता, विभागीय आरोग्य साधनसामुग्री देखभाल व दुरुस्ती कार्यशाळा, अकोला यांच्या दिनांक ९.०१.२०१५ रोजीच्या तांत्रिक अहवालानुसार सदर यंत्राच्या दुरुस्तीकरीता लागणाऱ्या सुटया भागांचा खर्च त्या यंत्राच्या खरेदी किंमतीच्या अंदाजे ८६ टक्क्यापेक्षा जास्त असल्याने, यंत्राचे सुटे भाग उपलब्ध होत नसल्याने व यंत्राचे मॉडेल कालबाहय झाल्याने तसेच सदर यंत्र दुरुस्ती करुनसुध्दा जास्त दिवस समाधानकारक राहील याची खात्री येत नसल्याने ते निर्लेखित करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

| .क्र. | उपकरणाचे नांव | खरेदी किंमत (रूपये) | मिळाल्याचा दिनांक | घसारा किंमत (रूपये) | उपकरणाची सद्यस्थिती |
|---|---|---|---|---|---|
| १. | क्ष-किरण यंत्र<br>Model No.Vertix I(P3E)<br>Sr. No.01636524 | १,९६,५८०/- | २५.०३.१९९७ | १९,६५८/- | यंत्र नादुरुस्त असून आयुर्मान संपले आहे. |

सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२ दि.१७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील भाग पहिला, उपविभाग-१ मधील अनुक्रमांक २३ येथील नियम क्रमांक १४६ अन्वये जडवस्तू संग्रहातील निरूपयोगी वस्तू निर्लेखित करण्याबाबत प्रशासनिक विभागास पुर्ण अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९१८१५३११७४९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prakash Indalkar

Digitally signed by Prakash Indalkar
DN: CN = Prakash Indalkar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.09.19 12:58:17 +05'30'

**( प्रकाश इंदलकर )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र- १/ २ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
२. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
३. सह संचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये), मुंबई.
४. उप संचालक, आरोग्य सेवा मंडळ, अकोला.
५. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, यवतमाळ.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, जि. यवतमाळ.
७. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
८. वित्त विभाग (विनियम कार्यासन), मंत्रालय, मुंबई.
९. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. निवडनस्ती (आरोग्य-३).